जे शासकीय कर्मचारी त्यांच्या मूळ नेमणुकीसाठी पात्र नव्हते अथवा अर्हताप्राप्त नव्हते असे नंतर आढळून येईल त्यांच्याविरुद्ध कारवाई करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
निर्णय क्र.सीडीआर-१०९५/९९५/प्र.क्र.३/९६/अकरा,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२. दिनांक :- ३१ ऑक्टोबर १९९६.

वाचा:- १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-सीडीआर-१०९३/१०७७/प्र.क्र.२३/९३/अकरा, दिनांक १२ आक्टोबर, १९९३.
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक बीसीसी-१०९४/प्र.क्र.२८/९४/१६-ब, दिनांक १५ डिसेंबर १९९५.

निर्णय :- शासकीय सेवकांनी त्यांच्या मूळ नेमणुकीच्यावेळी खोटी माहिती दिल्यास अथवा ते मूळ नेमणुकीस अर्हताप्राप्त नव्हते, असे निदर्शनास आल्यास त्यांचेविरुद्ध करावयाच्या कारवाईबाबत उपरोक्त दिनांक १२ आक्टोबर, १९९३ च्या निर्णयानुसार सविस्तर सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. (प्रत संलग्न) या शासन निर्णयात मूळ नेमणुकीनंतर सेवेत असताना पदोन्नतीच्या फायद्यासाठी खोटे प्रमाणपत्र सादर केल्याचे निदर्शनास आल्यास काय कार्यवाही करावी याबाबतच्या सूचना नाहीत.

२. वरील मुद्दयाबाबत असे ठरविण्यात आले आहे की, "जर एखाद्या शासकीय सेवकाने मूळ नेमणुकीनंतर पदोन्नतीच्या फायद्यासाठी जातीचे खोटे प्रमाणपत्र दाखल करुन पदोन्नती मिळविली असेल आणि सदर बाब नंतर काही कालांतराने निदर्शनास आल्यास त्या कर्मचाऱ्याच्या पदोन्नतीचे आदेश तात्काळ रद्द करण्यात यावेत व त्याला त्याच्या मूळ पदावर पदावनत करावे. तसेच संबंधित कर्मचाऱ्याविरुद्ध शिस्तभंगाची कार्यवाही तात्काळ सुरु करण्यात यावी."

३. याविषयी असेही स्पष्ट करण्यात येत आहे की, वर नमूद केलेल्या दिनांक १२ आक्टोबर, १९९३ च्या आदेशातील माहिती मूळ नेमणुकीच्या वेळेची असल्याने ती वय, अर्हता अथवा जात यापैकी कोणत्याही मुद्दयांबाबत असू शकते. परंतु, पदोन्नतीच्या वेळी विचारात घ्यावयाचे प्रमाणपत्र केवळ मागासवर्गीयांसाठीच्या राखीव जागांच्या आदेशांच्या अनुषंगाने त्यांच्यातील प्रवर्गापुरते मर्यादित असते. त्यानुसार वरील परिच्छेद २ मधील सूचना केवळ ज्या प्रकरणात जातीचे खोटे प्रमाणपत्र दाखल केल्याचे आढळून येईल अशा प्रकरणांना लागू होते.

४. दिनांक १५ जून, १९९५ पूर्वी विशेष मागास प्रवर्गातील ज्या व्यक्तींनी या आधीच अनुसूचित जमातीच्या प्रमाणपत्राच्या आधारे शासकीय/निमशासकीय सेवेत प्रवेश मिळवून पदोन्नती प्राप्त केली आहे अशांनो शासन निर्णय क्रमांक-बीसीसी-१०९४/प्र.क्र.६८/९४/१६-ब, दिनांक १५ डिसेंबर, १९९५ (प्रत संलग्न) मध्ये स्पष्ट केल्यानुसार पदावनत करण्यात येऊ नये किंवा सेवेतून काढून टाकण्यात येऊ नये. दिनांक १५ जून, १९९५ च्या नंतर विशेष मागास प्रवर्गातील ज्या व्यक्ती अनुसूचित जमातीच्या प्रमाणपत्राच्या आधारे शासकीय सेवेत प्रवेश मिळवतील किंवा पदोन्नत होतील अशा कर्मचाऱ्यांची प्रमाणपत्रे खोटी आढळल्यास त्यांच्याविरुद्ध परिच्छेद २ प्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

रा. द. कासार,
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
उप मुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक,
सर्व अतिरिक्त मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
उप सचिव, मुख्य सचिवांचे कार्यालय,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ न्याय शाखा), मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानसभा सचिवालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानपरिषद सचिवालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,

---------------

* पत्राने

विशेष मागास प्रवर्गाकरिता शासकीय/निमशासकीय सेवेत आरक्षण

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक :- बीसीसी-१०९४/प्र.क्र.६८/९४/१६-ब,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२. दिनांक :- १५ डिसेंबर, १९९५.

पहा:- १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र बीसीसी-१०९४/प्र.क्र.६८/९४/१६-ब, दिनांक ८ डिसेंबर १९९४.

२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र बीसीसी-१०९४/प्र.क्र.६८/९४/१६-ब, दिनांक २ जानेवारी, १९९५.

३) शासन निर्णय, समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग, क्र.बीसीसी-१४९४/प्र.क्र.२३६/मावक-५, दिनांक ७ डिसेंबर, १९९४.

४) शासन निर्णय, समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग, क्र.सीबीसी-१४९४/प्र.क्र.२३६/मावक-५, दिनांक १३ जून, १९९५.

५) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र बीसीसी-१०९४/प्र.क्र.६८/९४/१६-ब, दिनांक १५ जून, १९९५.

६) समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग, शुद्धिपत्र क्र.सीबीसी-१४९४/प्र.क्र.२३६/मावक-५, दिनांक १५ जून, १९९५.

७) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र बीसीसी-१०९४/प्र.क्र.६८/९४/१६-ब, दिनांक ३ जुलै, १९९५.

**शासन निर्णय :-** समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभागाने शासन निर्णय, क्रमांक-सीबीसी-१४९४/प्र.क्र.२३६/मावक-५, दिनांक १३ जून, १९९५ व समक्रमांकाचे शुद्धिपत्र दिनांक १५ जून, १९९५ नुसार जाहीर केलेल्या विशेष मागास प्रवर्गासाठी सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्रमांक बीसीसी-१०९४/प्र.क्र.६८/९४/१६-ब, दिनांक १५ जून, १९९५ अन्वये शासकीय/निमशासकीय सेवेत २% आरक्षण निर्धारित करण्यात आलेले आहे. या शासन निर्णयाच्या परिच्छेद-४ मध्ये सुधारणा करुन दिनांक ३ जुलै, १९९५ रोजी सुधारित आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. फेरविचारांती शासनाने दिनांक ३ जुलै, १९९५ रोजीचा शासन निर्णय रद्द केला आहे व दिनांक १५ जून, १९९५ चा आदेश कायम ठेवावा असा निर्णय घेतला आहे. दिनांक १५ जून, १९९५ ते दिनांक ३ जुलै, १९९५ मधील कालावधीत जर कोणास पदावनतं केले असेल तर त्यास पूर्ववत लाभ देण्यात यावा व त्याचे नुकसान होणार नाही हे पहावे असे आदेशही देण्यात येत आहेत.

२. शासन असाही आदेश देत आहे की, विशेष मागास प्रवर्गातील जातीसंदर्भात समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभागाने यापुढे काही बदल केल्यास ते या आदेशासही लागू राहतील.

३. हे आदेश मंत्रालयीन विभागांनी त्यांच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुखांच्या व कार्यालय प्रमुखांच्या निदर्शनास आणावेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

क. चं. श्रीवास्तव,
प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव/अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ न्याय शाखा), मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
सचिव, सर्व प्रादेशिक निवड मंडळे,
सचिव, राज्य निवड मंडळ,
संचालक, समाजकल्याण, पुणे,
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक,
संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे,
संचालक, सेवायोजन, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सर्व मंत्रालयीन विभाग,
निवड नस्ती

----------

* पत्राने

जे शासकीय कर्मचारी त्यांच्या मूळ नेमणुकीसाठी पात्र नव्हते अथवा अर्हताप्राप्त नव्हते असे नंतर आढळून येईल त्यांच्याविरुद्ध कारवाई करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
निर्णय क्र.सीडीआर-१०९३/१०७७/प्र.क्र.२३/९३/अकरा,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२. दिनांक :- १२ ऑक्टोबर १९९३.

**नि र्ण य**

शासकीय सेवकांनी त्यांच्या नेमणुकीपूर्वी केलेल्या गैरव्यवहाराच्या अनुषंगाने त्यांच्याविरुद्ध कारवाई करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. साधारणत: शासकीय सेवकांनी त्यांच्या नेमणुकीच्या वेळी खोटी माहिती दिल्यास त्याच्याविरुद्ध कारवाई करण्यासाठी साक्षांकन नमुन्यात समाविष्ट केलेल्या "ताकिद" या तरतुदीचा वापर संबंधित विभाग/कार्यालय यांनी करावयाचा असतो.

२. आता असा प्रश्न उपस्थित झाला आहे की, एकदा शासकीय सेवक त्याच्या शासन सेवेतील मूळ नेमणुकीसाठी पात्र नव्हता अथवा अर्हताप्राप्त नव्हता असे नंतर आढळून आल्यास अशा कर्मचाऱ्याला सेवेतून मुक्त करता येईल काय, याबाबत सर्वोच्च न्यायालयाने जिल्हाधिकारी, विझियानगरम विरुद्ध एम. त्रिपुर सुंदरी देवी (१९९०/(४) एसएलआर-२३७) या प्रकरणात या मुद्दयांचा विचार केला असून पुढीलप्रमाणे अभिप्राय दिले आहेत.

"त्याखेरीज सर्व संबंधितांनी याचीही जाणीव ठेवली पाहिजे की, ज्यावेळी जाहिरातीमध्ये विशिष्ट अर्हता नमूद केलेली असते आणि एखादी नेमणूक तिच्याकडे दुर्लक्ष करुन करण्यात येते त्यावेळी ते प्रकरण केवळ नियुक्ती प्राधिकारी व नियुक्त व्यक्ती यांच्या पुरतेच रहात नाही. ज्यांच्याकडे नियुक्त व्यक्ती अथवा व्यक्तींच्या अर्हतेसमान अथवा त्यापेक्षा जास्त अर्हता असेल. परंतु जाहिरातीत नमूद केलेली अर्हता नसल्यामुळे ज्यांनी अर्ज केले नसतील असे सर्वजण व्यथित असतात. अशा परिस्थितीत, अर्हता शिथिल करता येईल असे जर स्पष्टपणे नमूद केलेले नसेल तर, अशा कमी दर्जाची अर्हता असणाऱ्या व्यक्तीची नेमणूक करणे ही जनतेची फसवणूक होईल. असे फसवणुकीचे व्यवहार चालू ठेवण्यात कोणत्याही न्यायालयाने सहभागी होऊ नये."

त्यानुसार आता असे ठरविण्यात आले आहे की, ज्या प्रकरणात असे आढळून येईल की, एखादा शासकीय कर्मचारी शासन सेवेतील मूळ नेमणुकीसाठी संबंधित पदाच्या सेवाप्रवेश नियमातील तरतुदीप्रमाणे पात्र नव्हता अथवा विहित अर्हताप्राप्त नव्हता. अथवा त्याने नेमणूक मिळण्यासाठी खोटी माहिती दिली होती अथवा खोटे प्रमाणपत्र सादर केले होते, त्या कर्मचाऱ्याला सेवेत ठेवण्यात येऊ नये. जर तो परिवीक्षाधीन अथवा अस्थायी शासकीय कर्मचारी असेल तर त्याला सेवामुक्त करण्यात यावे अथवा त्याच्या सेवा समाप्त करण्यात याव्यात. जर तो स्थायी शासकीय कर्मचारी असेल तर त्यांच्याविरुद्ध महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम १९७९ मधील नियम ८ मध्ये विहित केल्याप्रमाणे विभागीय चौकशी करण्यात यावी आणि आरोप सिद्ध झाल्यास त्या शासकीय कर्मचाऱ्यास सेवेतून काढून टाकावे अथवा सेवेतून बडतर्फ करावे, परंतु कोणत्याही परिस्थितीत यापेक्षा कोणतीही वेगळी शिक्षा लादू नये.

३. अशा प्रकारची सेवामुक्ती, सेवासमाप्ती, सेवेतून काढण्याची कारवाई अथवा बडतर्फीची कारवाई केल्यामुळे सदरहू शासकीय कर्मचाऱ्याविरुद्ध न्यायालयात खटला भरण्याच्या शासनाच्या अधिकारास बाधा येणार नाही.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

अ. ग. मंडपे,
उप सचिव, महाराष्ट्र शासन.
सामान्य प्रशासन विभाग

Action against Government Servants to be taken if they are later found ineligible or unqualified for their initial recruitment.

GOVERNMENT OF MAHARASHTRA
General Administration Department,
Resolution No.CDR-1093/1077/CR-23/93/XI,
Mantralaya, Bombay-400 032, Dated the 12th October, 1993.

## RESOLUTION

The question of taking action against the Governement Servants in respect of misconduct committed before their employment has been under considertation of Government for some time past. Normally the Department/Office is required to make use of the provision of 'Warning' inserted in the Attestation Form for taking action against the Government Servant furnishing false information at the time of appointment.

2. A question has now arisen as to whether a Governemtn servant can be discharged from service where it is discovered later that the Government servant was not qualified or eligible for his initial recruitment in service. The Supremen Court in its judgement in the District Collector, Vizianagaram Vs. M. Tripura Sundari Devi (1990 (4) SLR 237) went into this issue and observed as under :-

> "It must further be realised by all concerned that when an advertisement mentions a particular qualification and an appointment qualification and an appointment is made in disregard of the same, it is not a matter only between the appointing authority and the appointee concerned. The aggrieved are all those who had similar or better qualifications than the appointee or appointees but who had not applied for the post because they did not possess the qualified for the post because they did not possess the qualifications mentioned in the advertisement. It amounts to a fraud on public to appoint a person with inferior qualifications in such circumstances unless it is clearly stated that the qualifications are relaxable. No Court should be a party to the prepetuation of the fraudulent practice."

It has now been decided that wherever it is found that a Government servant, who was not qualified or eligible in terms of the recruitment rules etc. for initial recruitment in service or had furnished false information or produced a flse certificate in order to sercure appointment, he should not be retained in service. It he is a probationer or a temporary Government servant, he should be discharged or his services should be terminated. It he has become a permanent Government servant, an inquiry as prescribed in Rule 8 of the Maharashtra Civil Services (Discipline and Appeal) Rules, 1979 may be held and if the charged are proved, the Government servant should be removed or dismissed from service. In no circumstances should any other penalty be imposed.

3. Such discharge, termination, removal or dismissal from service would, however, be without prejudice to the right of the Government to prosecute such Government servants.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

A. G. MANDPE,
Deputy Secretary to the Government of Maharashtra,
General Administration Department.

To,

The Secretary to the Governor,
The Secretary to the Chief Minister,
All Departments of the Mantralaya,
* Registrar, High Court (Original Side), Bombay,
* Registrar, High Court (Appellate Side), Bombay,
* Registrar, Office of the Lok Ayukta and Upa Lokayukta, Bombay,
* Secretary, Maharashtra Legislative Assembly Secretariat, Bombay,
* Secretary, Maharashtra Legislative Council Secretariat, Bombay,
* Secretary, Maharashtra Public Service Commission, Bombay,

All Heads of Departments and Heads of Offices under the Several Departments of the Mantralaya.

---

* By letter